सन १९८६ ते २००४ या कालावधीच्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या तात्पुरत्या स्वरुपात प्रसिध्द करण्यात आलेल्या ज्येष्ठतासूच्या/ निवडसूच्यांवर प्राप्त झालेल्या /होणाऱ्या हरकती व सूचनांची तसेच या अनुषंगाने प्राप्त निवेदनातील मुद्यांची तपासणी करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः संकिर्ण २०१९/प्र.क्र.७२/१४-ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०४ नोव्हेंबर, २०१९

**शासन आदेश**

*सरळसेवा कक्ष अधिकारी तसेच पदोन्नत कक्ष अधिकारी यांनी "मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गाच्या सन १९८६ ते २००० या कालावधीतील दिनांक १ जानेवारी रोजीच्या परस्पर सेवा ज्येष्ठतेबाबत" मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्रमांक "२९८६/२०००, २९८२/२०००, ४९५८/२००३ आणि ३३७४/ २०११" दाखल केल्या होत्या. मा. उच्च न्यायालयाने दि.०६.०८.२०१८ रोजी या याचिका एकत्रितरित्या निकाली काढल्या आहेत. मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास अनुसरुन सन १९८६ पासूनच्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, अवर सचिव, उपसचिव, सहसचिव संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्यासाठी शासन आदेश, दि.१२.१०.२०१८ अन्वये अवर सचिव, सा.प्र.वि/कार्यासन १४ यांच्या पर्यवेक्षीय नियंत्रणाखाली एक गट (Cell) स्थापन करण्यात आला आहे. सदर गटाकडून तयार करण्यात आलेल्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या सन १९८६ ते २००४ या कालावधीच्या ज्येष्ठतासूच्या/निवडसूच्या हरकती /सूचना मागविण्यासाठी प्रसिध्द करण्यात आल्या आहेत. सदर ज्येष्ठतासूच्या/निवडसूच्यांवर प्राप्त हरकती/ सूचना तसेच या अनुषंगाने प्राप्त निवेदनातील मुद्यांची तपासणी करण्याकरिता पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-*

| अ.क्र. | समिती सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | सचिव (सामाजिक विकास समन्वय),<br>सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | अवर सचिव (कार्यासन १४-ब),<br>सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. अनुक्रमांक २ व ३ येथील सदस्यांचे संबंधित प्रशासकीय विभागाच्या अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव यांच्याकडून नामनिर्देशन करण्यात येईल.

३. संबंधित समितीस सा.प्र.वि./कार्यासन १४-ब (दि.१२.१०.२०१८ च्या आदेशान्वये गठीत करण्यात आलेल्या गटासह) कडून आवश्यक ते सहकार्य करण्यात येईल.

४. समितीने आपला अहवाल एक महिन्याच्या कालावधीत सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१५२२३९३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.11.04 16:00:39 +05'30'

**( ग. भि. गुरव )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

४. प्रधान सचिव व विधि परामर्शि, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

(३ व ४: यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी अनुक्रमांक २ व ३ येथे नमूद सदस्यांचे नामनिर्देशन करावे.)

५. सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६. अवर सचिव (कार्यासन १४-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.